जिल्हास्तर वगळता जिल्हा परिषदांकडे हस्तांतरीत
करण्यात आलेल्या मागासवर्गीय मुलामुलींची
शासकीय वसतीगृहे परत राज्य शासनाकडे वर्ग
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शावगृ २००३/प्र.क्र.६६४/मावक ४,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २८ मे, २००४.

**वाचा :-** १) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
क्रमांक बीजीटी २०००/प्र.क्र.१५५/ अर्थसंकल्प, दिनांक ४ नोव्हेंबर, २०००.
२) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
क्रमांक सकआ २०००/प्र.क्र.२७१/आस्था २, दिनांक ४ नोव्हेंबर, २०००.
३) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
क्रमांक सकआ २०००/प्र.क्र.२७२/ आस्था २, दिनांक ६ नोव्हेंबर, २०००.
४) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
क्रमांक बीजीटी २०००/प्र.क्र.१५५/अर्थसंकल्प, दिनांक २४ जानेवारी, २००१.
५) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
क्रमांक बीजीटी २०००/प्र.क्र.१५५/अर्थसंकल्प, दिनांक ३ फेब्रुवारी, २००१.

**प्रस्तावना :-** सन १९९२ मध्ये ७३ वी व ७४ वी घटना दुरुस्तीमध्ये देशातील पंचायत राज व्यवस्था बळकट करण्याचे
निश्चित करण्यात आलेले आहे. त्यानुसार राज्यातील पंचायत राज व्यवस्था बळकट करण्याकरिता मा. मुख्यमंत्री
यांच्या अध्यक्षतेखाली नेमण्यात आलेल्या मंत्रीमंडळ उपसमितीने शिफारस केल्याप्रमाणे मा. मुख्यसचिव यांच्या
अध्यक्षतेखाली समिती नेमण्यात आली होती. सदर समितीच्या शिफारशीनुसार या विभागाच्या नियंत्रणाखालील
योजना जिल्हा परिषदेकडे हस्तांतर करण्याकरिता विभागीय आयुक्त, अमरावती यांच्या अध्यक्षतेखाली एक अभ्यासगट
नेमण्यात आला. सदर अभ्यासगटाने केलेल्या शिफारशीनुसार समाजकल्याण विभागाच्या एकूण ४० योजना जिल्हा
परिषदेकडे हस्तांतरीत करण्याचे प्रस्तावित करण्यात आले होते. त्यानुसार प्रस्ताव मंत्रीमंडळाच्या मान्यतेसाठी दिनांक
२६.९.२००० च्या बैठकीत ठेवण्यात आला होता. त्याप्रमाणे महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समित्या अधिनियमाच्या
कलम १०० खाली १६ व कलम १२३ खाली २४, दारूबंदी प्रचार कार्य, अपंग सल्ला व मार्गदर्शन केंद्र इत्यादी आणि
समाजकल्याण विभागांतर्गत असलेली जिल्हास्तरावरील शासकीय वसतीगृहे वगळता अन्य वसतीगृहे तेथील
कर्मचाऱ्यांसह जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत करण्यात यावी असा निर्णय घेण्यात आला त्यानुसार विभागाने शासन
निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक बीजीटी २०००/प्र.क्र.१५५/अर्थसंकल्प, दिनांक ४
नोव्हेंबर, २०००, २४ जानेवारी, २००१ व ३ फेब्रुवारी, २००१ अन्वये या ४० योजना जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत
केलेल्या आहेत. यामध्ये महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ च्या नियम १०० खाली
जिल्हास्तरावरील मागासवर्गीय मुलामुलींची शासकीय वसतीगृहे वगळता एकूण २४३ वसतीगृहांपैकी १६८ वसतीगृहे
जिल्हा परिषदेकडे तेथील कर्मचारी वर्गासह हस्तांतरीत केलेली आहेत. त्यामध्ये एकूण १३२१ पदांचा समावेश आहे. ही
पदे जिल्हा परिषदांकडे प्रतिनियुक्ती भत्ता न देता वर्ग करण्यात आली आहेत. ही वसतीगृहे परत राज्य शासनाकडे वर्ग
करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** शासन अधिसूचना क्रमांक : बीजीटी २०००/प्र.क्र.१५५/अर्थसंकल्प, दिनांक ४ नोव्हेंबर, २०००
अन्वये महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ च्या कलम १०० खाली जिल्हास्तर वगळता

जिल्हा परिषदांकडे हस्तांतरीत करण्यात आलेली "आर्थिकदृष्टया मागासलेल्या मुलामुलींसाठी वसतीगृहे सुरु करणे व त्यांची देखभाल करणे" ही योजना राज्य शासनाच्या सामाजिक न्याय विभागाकडे परत हस्तांतरीत करण्यात येत आहे.

२ वरील हस्तांतरीत होणारी शासकीय वसतीगृहे विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांचे नियंत्रणाखाली ठेवण्यात यावीत.

३ वरीलप्रमाणे शासकीय वसतीगृहे हस्तांतरीत करताना तेथील जिल्हा परिषदांकडे वर्ग करण्यात आलेली पदे व त्यानुसार प्रतिनियुक्ती भत्ता न देता वर्ग करण्यात आलेले सर्व कर्मचारी पदांसह परत राज्य स्तरावर वर्ग करण्यात यावीत.

४ ही योजना हाताळण्यासाठी जिल्हा परिषदांकडील समाजकल्याण विभागाकरीता शासन निर्णय दिनांक ४.११.२००० अन्वये मंजूर करण्यात आलेल्या एकूण ७ समाजकल्याण निरिक्षकांच्या पदांपैकी १ पद विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांच्या कार्यालयात स्थलांतरीत करण्यात यावे.

५ या संदर्भातील आर्थिक तरतूदीबाबत संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आवश्यक पुढील कार्यवाही करावी.

६ हा शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या आणि वित्त विभागाच्या सहमतीने, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ११६८/०३, व्यय-१४, दिनांक २१/१२/२००३ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(नं.मा.शिलवंत)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा) मुंबई / नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी.
सर्व समाजकल्याण अधिकारी (गट-अ), जिल्हा परिषद
निवड नस्ती, मावक ४.

महाराष्ट्र शासन

अधिसूचना

सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व
विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २८ मे, २००४.

**महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ :-**

क्रमांक : शावगृ २००३/प्र.क्र.६६४/मावक ४ महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र - पाच) च्या कलम १०० चे पोट कलम (१) चा खंड (ब) आणि कलम ६ चे पोट कलम (२) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा आणि त्या बाबतीत शासनास प्रदान करण्यात आलेल्या इतर सर्व अधिकारांचा वापर करुन शासन अधिसूचना क्रमांक : बीजीटी २०००/प्र.क्र.१५५/अर्थसंकल्प, दिनांक ४ नोव्हेंबर, २०००, २४ जानेवारी, २००१ व ३ फेब्रुवारी, २००१ अन्वये सामाजिक न्याय विभागाच्या ४० योजना जिल्हा परिषदांकडे हस्तांतरीत करण्यात आल्या होत्या. या योजनांपैकी दिनांक ४ नोव्हेंबर, २००० च्या अधिसूचनेमधील अनुक्रमांक १२ वर नमूद केलेली "आर्थिकदृष्टया मागासलेल्या मुलामुलींसाठी वसतीगृहे सुरु करणे व त्यांची देखभाल करणे" ही योजना ही अधिसूचना शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून सामाजिक न्याय विभागाकडे परत हस्तांतरीत करण्यात येत आहे.

२. वरील योजनेबाबत महाराष्ट्र शासन असेही निर्देशित करते की,

(अ) वरील हस्तांतरीत होणारी शासकीय वसतीगृहे विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांचे नियंत्रणाखाली ठेवण्यात यावीत.

(ब) वरीलप्रमाणे शासकीय वसतीगृहे हस्तांतरीत करताना तेथील जिल्हा परिषदांकडे वर्ग करण्यात आलेली पदे व त्यानुसार प्रतिनियुक्ती भत्ता न देता वर्ग करण्यात आलेले सर्व कर्मचारी वर्गासह परत राज्य स्तरावर वर्ग करण्यात यावीत.

(क) ही योजना हाताळण्यासाठी जिल्हा परिषदांकडील समाजकल्याण विभागाकरीता शासन निर्णय दिनांक ४.११.२००० अन्वये मंजूर करण्यात आलेल्या एकूण ७ समाजकल्याण निरिक्षकांच्या पदांपैकी १ पद विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांच्या कार्यालयात स्थलांतरीत करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(नं.मा.शिलवंत)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

## GOVERNMENT OF MAHARASHTRA

## NOTIFICATION

SOCIAL JUSTICE, CULTURAL AFFAIRS, SPORTS AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
MANTRALAYA ANNEX,
MUMBAI-400 032.
Dated the 28th May, 2004.

**Maharashtra :- Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961**

No. SVG 2003/C.R.664/BCW-IV In excercise of the powers conferred by clause (b) of sub-section (1) of section 100 and sub-section (2) of section 6 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961 (Mah V of 1962), and of all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra has transfered. 40 schemes which were implemented by the Social Welfare Department to the respective Zilla Parishads vide Notification No. BGT 2000- C.R.155-Budget, dated 4th November 2000, 24th January, 2001 and 3rd February, 2001 of Social Welfare Department. Out of these 40 schemes the scheme mention in column (12) of Notification dated 4th November, 2000. "Opening and maintenance of Government Hostels for economically backward class boys and girls" shall now be transferred back to the Social Justice Department with effect from the date of publication of this notification in the official Gazette.

2. For above mentioned transferred scheme, the Government of Maharashtra further directs that :-

A) These transferred hostels shall be kept under overall control of the Special District Social Welfare Officer of the respective District.

B) For implementation of this scheme the posts which were transferred to the Zilla Parishads and all State Government employees deputed without deputation allowance to the Zilla Parishads shall now be transferred to the State level.

C) For implementation of this scheme 7 posts of Social Welfare Inspectors were sanctioned to the Social Welfare Division of the Zilla Parishad vide G.R. dated 4th November 2000. Out of this 7 posts 1 post of the Social Welfare Inspector shall now be transferred to the office of the Special District Social Welfare Officer in the respective District.

By order and in the name of Governor of Maharashtra.

(N.M. Shilwant)
Under Secretary to Government.